**पुरक पोषण आहार योजना ( १९-आहार खर्च) हया केंद्र पुरस्कृत योजनेसाठी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीत तरतुदीपैकी रु.११२.४० कोटी (केंद्र हिस्सा ५०% व राज्य हिस्सा ५०%) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२०/प्र.क्र.६४/का-५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ एप्रिल,२०२०

वाचा :-वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६ एप्रिल,२०२०

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत पूरक पोषण आहार योजना (१९-आहार खर्च) ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांना गरम ताजा आहार व THR चे वितरण करण्यात येते. या योजनेकरीता लागणाऱ्या निधीचे प्रमाण हे केंद्र हिस्सा ५०% व समरुप राज्य हिस्स्या ५०% याप्रमाणे आहे.

या योजनेकरीता सन २०२०-२१ च्या राज्याच्या मुळ अर्थसंकल्पात एकात्मिक बाल विकास सेवा योजना (१९-आहार खर्च) याअंतर्गत मागणी क्रमांक एक्स-१,(०८)(०३) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (केंद्र हिस्सा ५०%) (कार्यक्रम) १९, आहार खर्च (२२३६१९२७) याखाली रु.५६२.०० कोटी व समरुप मागणी क्रमांक एक्स-१,(०८)(०४) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (राज्य हिस्सा ५०% ) (कार्यक्रम) १९, आहार खर्च (२२३६१९३६) याखाली रु.५६२.०० कोटी याप्रमाणे एकंदर रु.११२४.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

सद्य:स्थितीत वित्त विभागाच्या मान्यतेने या योजनेकरीता सन २०२०-२१ च्या राज्याच्या मुळ अर्थसंकल्पात करण्यात आलेल्या तरतूदीपैकी रु. ११२.४० कोटी (केंद्र व राज्य हिस्सा मिळून) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार या योजनकेरीता केंद्र हिस्सा ५०% याखाली रु.५६.२० कोटी व राज्य हिस्सा ५०% याखाली रु.५६.२० कोटी याप्रमाणे एकूण रु.११२.४० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) या योजनेकरीता सन २०२०-२१ च्या मुळ अर्थसंकल्पात करण्यात आलेल्या तरतूदीपैकी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात पूरक पोषण आहार योजना राबविण्यासाठी लागणाऱ्या खर्चाकरीता केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.५६.२० कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.५६.२० कोटी याप्रमाणे एकंदर रु.११२.४० कोटी

(अक्षरी रुपये एकशे बारा कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्याकरीता उपलब्ध करुन देण्यात येत असून सदर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात राज्यात पूरक पोषण आहार योजना राबविण्याकरीता वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. पुरक पोषण आहार योजनेंतर्गत १९-आहार खर्च या कार्यक्रमासाठी केंद्र हिस्सा (५०%) (लेखाशिर्ष संकेतांक २२३६१९२७) याखाली रु.५६.२०कोटी व समरुप राज्य हिस्सा (५०%) (लेखाशिर्ष संकेतांक २२३६१९३६) याखाली रु.५६.२० कोटी याप्रमाणे एकूण रु.११२.४० कोटी (अक्षरी रु. एकशे बारा कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका वित्त विभागाच्या मान्यतेने उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी हा गरम ताजा आहार व THR यासाठी समप्रमाणात वितरीत करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६०२१६१४४६४४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.06.02 16:21:09 +05'30'

( ला.रा.गुजर )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४) मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
७) सचिव (महिला व बालविकास विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,रायगड भवन, नवी मुंबई.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१२) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१३) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद).
१४) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प.

१५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई.
२०) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (१९-आहार खर्च) या प्रयोजनार्थ सन २०२०-२१ च्या राज्याच्या मुळ अर्थसंकल्पात करण्यात आलेल्या तरतुदीपैकी वित्त विभागाने वितरीत व खर्च करण्याकरीता दिलेल्या मान्यतेनुसार केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.५६.२० कोटी व समरुप राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.५६.२० कोटी याप्रमाणे एकूण रु.११२.४० कोटी इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना BDS प्रणालीवर वितरीत करावा.
२१) निवड नस्ती कार्या-५, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

-----------------